१४ ऑगस्ट, २०२२ रोजी फाळणी वेदना दिनानिमित्ताने प्रदर्शनासाठीझालेल्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -२०२२/प्र.क्र.१२५/सां.का.२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ फेब्रुवारी, २०२३.

वाचा:-१) सा.प्र.वि. शासन परिपत्रक क्र.सीईआर-२०२२/प्र.क्र.१२४/३०, दि.१२-०८-२०२२
२) संचालक,पुराभिलेख संचालनालय यांचे क्र.पुरा/संचा/ग्रंथाल/विविदि/२०२३/बी-१७९, दिनांक १९ जानेवारी, २०२३ रोजीचे पत्र.

**शासन निर्णय :-**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवानिमित्त दिनांक १४ ऑगस्ट, २०२२ रोजी फाळणी वेदना दिनानिमित्ताने देशाच्या फाळणीत बळी पडलेल्या लाखो लोकांच्या वेदना तसेच विस्थापित झालेल्या लोकांचे दु:ख जनतेसमोर मांडली जावी याकरीता केंद्र शासनाच्या योजनेनुसार या विभागाने दिलेल्या निदेशानुसार केंद्र शासनाने विहित केलेल्या घटनाचित्राचे पुराभिलेख संचालनालयाने पु. ल. देशपांडे, महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई येथे प्रदर्शन आयोजन करण्यात आले होते. दिनांक १४ ऑगस्ट, २०२२ रोजी फाळणी वेदना दिनानिमित्ताने पुराभिलेख संचालनालयाच्या वतीने आयोजित करण्यात आलेल्या प्रदर्शनासाठी झालेल्या एकूण खर्च रु. १, ३५,४४८/-(अक्षरी रूपये एक लक्ष पस्तीस हजार चारशे अठ्ठेचाळीस फक्त) एवढया खर्चास या शासन निर्णयानुसार प्रशासकीय व वित्तीय मंजूरी देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च "मागणी क्र- झेडडी-०२, प्रधानशिर्ष २२०५-कला व संस्कृती, (००) १०४ पुराभिलेख (०१) (०२) पुराभिलेख कार्यालये (२२०५ १७९५), १३ कार्यालयीन खर्च," या लेखाशिर्षांतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात येईल.

०३. संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांना यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. सदर कार्यक्रमासाठी झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांनी शासनास एक महिन्याच्या आत सादर करावे.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या, वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग दोन, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका१९७८, भाग-एक, उपविभाग तीन अ.क्र.४, परिच्छेद २७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागास असलेल्या प्राधिकारानुसार व वित्त विभागाने वितरणासाठी दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०२२११६२८४७१५२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, pseudonym=565ADED7321B71A5B0327BA1F7149AED1F618E4E, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2023.02.21 16:33:07 +05'30'

**( सु. दि. पाष्टे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई.

२. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.

३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

५. उप सचिव (व्यय-१५), वित्त विभाग मंत्रालय, मुंबई.

६. अवर सचिव, (अर्थसं.) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. निवड नस्ती, सां.का.२.